**मौजे बोडणी, ता. अलिबाग, जि. रायगड येथील प्रकल्पासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि १११९/ प्र.क्र. १३७/ पदुम १४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२३

<u>संदर्भ -</u>

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. मत्स्यवि २०१६/प्र. क्र. १५९/पदुम १३, दि. ०६.०३.२०१७
२) केंद्र शासनाचे दि. २३.०६.२०२१ रोजीचे पत्र
३) समक्रमांकाचा शासन निर्णय दि. १२ ऑक्टोबर, २०२१
४) केंद्र शासनाचे दि. २३.११.२०२१ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना :</u>**

केंद्र पुरस्कृत नीलक्रांती योजना राज्यात राबविण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर शासन निर्णयाच्या तक्त्यातील अ. क्र. १६ येथे “मासेमारी बंदर व मासे उतरविणाऱ्या केंद्रावर जेट्टींचे नविन बांधकाम” या उप-योजनेचा समावेश करण्यात आला असुन त्या अंतर्गत हाती घेण्यात येणाऱ्या प्रकल्पाकरिता रू. ८००.०० लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर उप योजनेंतर्गत मौजे बोडणी, ता. अलिबाग, जि. रायगड येथील कामाचा समावेश करण्यात आला. सदर कामासाठी आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांच्या स्तरावरून निविदा प्रक्रिया राबविण्यात आली होती. सदर निविदेमध्ये स्कायपार्क इन्फ्रा प्रोजेक्टस प्रायव्हेट मर्या., यांची रु. ६६४.७१ लक्ष रकमेची निविदा अंतिम करण्यात येऊन कार्यारंभ आदेश देण्यात आले.

२. केंद्र शासनाने दि. २३.०६.२०२१ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिस्सा प्रकल्प किंमत किंवा प्रकल्पाची तांत्रिक मान्यता यापैकी जी कमी असेल त्याच्या अधीन राहील, असे कळविले. बोडणी या प्रकल्पास रु. ६६४.७० लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता असल्यामुळे या प्रकल्प किमतीच्या ५० टक्के केंद्र हिस्सा (रु. ३३२. ३५ लक्ष) व उर्वरीत ५० टक्के राज्य हिस्सा (रु. ३३२.३५ लक्ष) या प्रमाणात संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली.

३. तथापि, केंद्र शासनाने संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये बोडणी करिता केंद्र हिस्सा रु. २००.०० लक्ष निश्चित केला असून उर्वरीत हिस्सा रु. ४६४.७० लक्ष राज्य हिश्यातून अदा करण्याचे कळविले आहे. त्यानुसार बोडणी येथील प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>**

केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत मौजे बोडणी, ता. अलिबाग, जि. रायगड येथील प्रकल्पासाठी रू. ६६४.७० लक्ष (अक्षरी रू. सहा कोटी चौसष्ट लाख सत्तर हजार मात्र) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देत येत असून सदर प्रकल्पाकरिता केंद्र हिस्सा रु. २००.०० लक्ष तर राज्य हिस्सा रु.४६४.७० लक्ष इतका राहणार आहे.

२. सदर योजनेकरिता केंद्र शासनाकडून प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेतून निधी प्राप्त होणार आहे. त्यामुळे प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेंतर्गत भांडवली खर्चासाठी घेण्यात आलेल्या खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

| केंद्र हिश्याच्या निधीसाठीचे लेखाशीर्ष | राज्य हिश्याच्या निधीसाठीचे लेखाशीर्ष |
|---|---|
| मागणी क्र. डी ०९,<br>४४०५-मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च,<br>१०३ सागरी मत्स्यव्यवसाय,<br>०२ - प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजना (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(०२) (०२) प्रधानमंत्री मत्स्यसंपदा लाभार्थी हिस्सा नसलेल्या योजना<br>३३-अर्थसहाय्य (४४०५ ३४७२) | मागणी क्र. डी ०९,<br>४४०५-मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च,<br>१०३ सागरी मत्स्यव्यवसाय,<br>०२ - प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजना (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(०२) (०३) प्रधानमंत्री मत्स्यसंपदा लाभार्थी हिस्सा नसलेल्या योजना<br>३३-अर्थसहाय्य (४४०५ ३४८१) |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०२१८१३५०११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY JAGANNATH SAVANE

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eecf658e3610fa137d1ea1fd3304d639f1d5384d08303b49875a1fb41cb9c5b8, pseudonym=BE10EB938AF079487419C9BFE07F030E4670A798, serialNumber=86F57086A2BEEC37477C2F6210FB8A27626CA243A845EA1A73F70CF31BE98102, cn=SANJAY JAGANNATH SAVANE
Date: 2023.06.02 18:14:56 +05'30'

**( सं. ज. सवने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय , मुंबई
८. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी/ उप कोषागार अधिकारी,, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड,
१२. रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१३. सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१४. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
१५. कक्ष अधिकारी (व्यय/अर्थसंकल्प) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती.